**नगरपरिषद/ नगरपंचायत आस्थापनेवरील कर्मचऱ्यांचे वेतन व नियमित निवृत्ती वेतनासाठी १००% नगरपालिका सहायक अनुदानाची रक्कम उपलब्ध करुन देण्याबाबत...**

## महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः एमसीओ २०१४/प्र.क्र. १५५/नवि १४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक : २५ ऑगस्ट, २०१४**

**संदर्भ :-**

शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांकः संकीर्ण २००९/प्र.क्र. १०६/०९/नवि १४, दिनांक ३१ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना :-**

राज्यातील काही नगरपरिषदांच्या कर्मचाऱ्यांना संबंधित नगरपरिषदेची आर्थिक परिस्थिती समाधानकारक नसल्याने वेळेवर वेतन मिळत नसल्याने शासनाने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये नगरपरिषदा/ नगरपंचायतींना "नगरपालिका सहायक अनुदान" सुरू केले होते. सदर अनुदानाचा विनियोगासाठी खालील प्राधान्यक्रमानुसार प्रयोजने विहित करण्यात आली आहेत. :-

१. नगरपरिषद कर्मचाऱ्यांचे मासिक वेतन व भत्ते

२. निवृत्त नगरपरिषद कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्ती वेतन व भत्ते

३. अपरिहार्य कार्यालयीन खर्च

४. पाणीपुरवठा व मलनि:स्सारण व्यवस्थेची वीज देयके

५. पथदिव्यांची वीज देयके

६. वरील १ ते ५ बाबींवरील खर्च भागविल्यानंतरच उर्वरीत रक्कम विकास कामावर खर्च करता येईल.

०२. वरील प्राधान्य क्रमानुसार अनुदानाचा विनियोग करुनही नगरपरिषदा/ नगरपचंयातींना सद्य:स्थितीत मिळणारे सहायक अनुदान नगरपरिषद कर्मचाऱ्यांचे वेतन व निवृत्ती वेतनासाठी कमी पडत असल्याची बाब शासनाच्या निर्दशनास आली. यास्तव नगरपरिषद/ नगरपंचायत आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व नियमित निवृत्ती वेतनासाठी १००% सहायक अनुदानाची रक्कम उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भातील प्रस्ताव वित्त विभागाच्या अभिप्रायासह मंत्रिमंडळाच्या विचारार्थ सादर करण्यात आला होता. नगर विकास विभागाने सादर केलेल्या प्रस्तावावर दिनांक १३.०८.२०१४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत विचार होऊन मंत्रिमंडळाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

ज्या नगरपरिषदा/ नगरपंचायतींची मालमत्ता कर व पाणीपट्टी वसुलीची टक्केवारी कमीत कमी ९०% असेल अशाच नगरपरिषदा/ नगरपंचायतींना वेतन व नियमित निवृत्ती वेतनासाठी १००% सहायक अनुदान मंजुर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. ज्या नगरपरिषदा/ नगरपंचायती यांची मालमत्ता कर व पाणीपट्टी वसुलीची टक्केवारी ९० टक्क्यापेक्षा कमी असेल त्यांना दि. ३१.०८.२००९ च्या शासन निर्णयानुसार अनुज्ञेय असलेले आणि वेळोवेळी सुधारीत केल्यानुसार सध्या प्राप्त होणारे सहायक अनुदान देय राहील.सदर सहायक अनुदान वितरणाची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे राहील :-

१. सहायक अनुदान वितरणाची कार्यपध्दत सप्टेंबर ,२०१४ पासून अंमलात येईल.

२. प्रत्येक नगरपरिषद /नगरपंचायत यांना शासन निर्णय, नगर विकास विभाग दि.३१.८.२००९ अन्वये अनुज्ञेय असलेले व वेळोवेळी सुधारित केल्यानुसार सध्या प्राप्त होणारे सहायक अनुदान आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन यांचेकडून प्रचलित पध्दतीनुसार वितरित करण्यात येईल.

३. ज्या नगरपरिषदा/नगरपंचायतींची मागील आर्थिक वर्षाची अनुक्रमे मालमत्ता कर व पाणीपट्टी वसुलीची प्रत्येकी टक्केवारी ९०% किंवा त्यापेक्षा जास्त असेल व त्यांच्या वेतन व निवृत्ती वेतनावरील खर्च सध्या अनुज्ञेय असलेल्या अनुदानाच्या रक्केमपेक्षा जास्त असेल तर त्यांनी वाढीव अनुदानाची मागणी जिल्हाधिकारी यांच्यामार्फत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन यांच्याकडे त्या सादर करावी. नगरपरिषदांनी अशी वाढीव अनुदानाची मागणी त्रैमासिक करावयाची असून वसूलीची टक्केवारी नगराध्यक्ष व मुख्याधिकारी यांनी प्रमाणित करणे बंधनकारक राहील.

४. जिल्हाधिकारी कार्यालयांनी नगरपरिषदांच्या वसुलीची टक्केवारी, त्यांना दि.३१.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेले व वेळोवेळी सुधारित केल्यानुसार अनुज्ञेय असलेले व नगरपरिषदांचा वेतन व नियमित निवृत्तीवेतनावरील प्रत्यक्ष खर्च विचारात घेऊन त्यांना देय होणाऱ्या वाढीव अनुदानाची रक्कम निश्चित करुन अनुदानाची मागणी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन यांचेकडे करावी.

५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी जिल्हाधिकारी कार्यालयांकडुन प्राप्त झालेली वाढीव अनुदानाची मागणी तपासून त्यांना वाढीव अनुदान संबंधित जिल्हाधिका-यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) उपलब्ध करुन दयावे. सदर वाढीव अनुदान जिल्हाधिका-यांनी संबंधित नगरपरिषद/नगरपंचायत यांना वितरित करावे.

६. ज्या नगरपरिषदा/नगरपंचायती यांना सन २००९-१० ते सन २०१२-१३ या कालावधीत सहायक अनुदानाचे अतीप्रदान झाले आहे त्या नगरपरिषद/नगरपंचायत यांना सहायक अनुदान वितरीत करतांना नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने निश्चित केलेल्या वसुलीच्या धोरणानुसार वसुली करुन सहायक अनुदान वितरीत करावे.

७. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने अतिप्रदान रक्कम वसूल करुन वसूलीचा वार्षिक अहवाल शासनास सादर करावा. अतिप्रदानीत रक्कमेची वसूली निश्चित केलेल्या धोरणानुसार होईल हे पाहण्याची जबाबदारी संचालनालयाची राहील.

८. जिल्हाधिकारी कार्यालयांनी नगरपरिषदांकडून वार्षिक उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन ती प्रादेशिक संचालक तथा विभागीय आयुक्त यांचेमार्फत नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडे सादर करावीत.

०२. वर नमुद केलेल्या कार्यपद्धतीनुसार संबंधित नगरपरिषद/ नगरपंचायती यांना सहायक अनुदान वितरीत होत आहे किंवा कसे हे काटेकोरपणे तपासण्याची जबाबदारी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांची राहील. सदर वाढीव अनुदान महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम ७६ अन्वये आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी मंजुर केलेल्या आकृतीबंधातील पदांवर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतन व नियमित निवृत्ती वेतनासाठी देय राहील. तसेच, यापुढे उक्त अधिनियमाच्या कलम ७६ अन्वये संबंधित नगरपरिषदेचा आकृतीबंध सुधारीत करण्यासाठी अथवा नविन पदे निर्माण करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी शासनाची पुर्व मान्यता प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

०३. हा शासन निर्णय राज्यात नव्याने स्थापन झालेल्या व भविष्यात नव्याने निर्माण होणाऱ्या नगरपरिषदा/ नगरपंचायती यांनाही लागू राहील.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ ४५४/व्यय-३, दि. ०८.०८.२०१४ अन्वये प्राप्त अभिप्राय विचारात घेऊन राज्य मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे

०५. या वर होणारा खर्च **"मागणी क्र. एफ-२ , २२१७, नगर विकास ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (००) (६०) जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना सहायक अनुदान (२२१७८०६६)"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि त्या शिर्षाखाली सन २०१४-१५ साठी मंजुर तरतुदीतुन भागविण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१९०७२५९२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: CN = Jayasingrao Nanasaheb Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2014.08.25 15:29:22 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**शासनाचे उप सचिव**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (ले व को), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक

१०.सर्व जिल्हाधिकारी
११.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१५.सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत
१६.प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
१७.सर्व सह/उप/अवर सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८.नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
१९.निवड नस्ती/ नवि १४